**अनुसूचित जमाती व इतर पारंपारिक वन निवासी (वनहक्कांची मान्यता) अधिनियम, २००६ व नियम २००८ आणि सुधारीत नियम, २०१२.**
**स्वयंसेवी संस्थांच्या सहाय्याने सामूहिक वनहक्क संवर्धन व व्यवस्थापन आराखडे तयार करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**आदिवासी विकास विभाग**
**शासन शुद्धीपत्रक क्रमांकः वहका-२०१८/प्र.क्र.१३/का-१४**
**मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,**
**मंत्रालय, मुंबई-४०००३२**
**दिनांक:-२५ ऑक्टोंबर, २०१८**

**वाचा -**

१) अनुसूचित जमाती व इतर पारंपारिक वन निवासी (वन हक्कांची मान्यता) अधिनियम २००६ व नियम २००८ आणि सुधारित नियम २०१२.

२) आदिवासी विकास विभाग शासन निर्णय, क्र. वहका-२०१८/प्र.क्र.१३/का-१४, दि. १७ फेब्रुवारी, २०१८

**प्रस्तावना -**

उपरोक्त वाचा क्र. २ येथील शासन निर्णयातील परिशिष्ट "अ" मध्ये दर्शविलेल्या (१) वृक्षमित्र गडचिरोली, चंद्रपुर (२) सृष्टी संस्था येरंडी, गडचिरोली (३) आम्ही आमच्या आरोग्यासाठी, गडचिरोली (४) पर्यावरण मित्र विरुर स्टेशन, चंद्रपुर या स्वयंसेवी संस्थेच्या सहाय्याने गडचिरोली व चंद्रपुर जिल्हातील ७५ गावांचे संवर्धन व व्यवस्थापन आराखडे तयार करण्यासाठी संबंधित ग्रामसभा, स्वयंसेवी संस्थेचे प्रतिनिधी व आयुक्त संशोधन व प्रशिक्षण संस्था महाराष्ट्र राज्य पुणे यांचेशी त्रिपक्षी करारनामा करण्यात येणार आहे. सदर करारनामा करण्यासाठी या शासन निर्णयाचे पुढील प्रमाणे शुद्धीपत्रक काढण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन शुद्धीपत्रक-**

**वाचा क्र. २ येथील शासन निर्णयातील परिच्छेद ३ मधील अनुक्रमांक १,३ व ५ पुढील प्रमाणे आहेत.**

१) सदर योजनेची मुख्य अंमलबजावणी धारक म्हणून "परिशिष्ट -अ व ब " मध्ये दर्शविलेल्या स्वयंसेवी संस्था त्यांच्याशी संबंधित असलेल्या गावांच्या बाबतीत काम पाहतील व शासनासोबत समन्वय साधतील.

३) अनुसूचित जमाती, इतर पारंपारिक वन निवासी ( वन हक्काची मान्यता) अधिनियम, २००६ व नियम २००८ आणि सुधारित नियम २०१२ मधील तरतूदींनुसार तसेच शासनासमवेत केलेल्या योजनेच्या करारनाम्यातील अटी व शर्तीनुसार सदर योजनेची अंमलबजावणी करण्याची जबाबदारी संबंधित स्वयंसेवी संस्थांवर राहील.

५) या योजनेच्या अंमलबजावणीविषयी संपूर्ण अभिलेख जतन करण्याची व शासनामार्फत वेळोवेळी मागणी केल्यानुसार माहिती सादर करण्याची तसेच राज्यस्तरीय सुकाणू समितीस सदर योजनेचा त्रैमासिक प्रगती अहवाल सादर करण्याची जबाबदारी स्वयंसेवी संस्थांवर राहील.

**उपरोक्त प्रमाणे परिच्छेद ३ मधील अनुक्रमांक १,३ व ५ ऐवजी पुढील प्रमाणे वाचावे.**

१) सदर योजनेची मुख्य अंमलबजावणी धारक म्हणुन “परिशिष्ट” “अ” मध्ये दर्शविलेल्या ग्रामसभा व “परिशिष्ट” “ब” मध्ये दर्शविलेल्या स्वयंसेवी संस्था त्यांच्याशी संबंधीत असलेल्या गावांच्या बाबतीत काम पहातील व शासनासोबत समन्वय साधतील.

३) अनुसूचित जमाती व इतर पारंपारिक वन निवासी (वन हक्कांची मान्यता) अधिनियम २००६ व नियम २००८ व सुधारणा नियम २०१२ मधील तरतूदीनुसार तसेच शासना समवेत केलेल्या योजनेच्या करारनाम्यातील अटी शर्तीनुसार सदर योजनेची अंमलबजावणी करण्यांची जबाबदारी संबंधीत “परिशिष्ट” “अ” मध्ये दर्शविलेल्या ग्रामसभा व “परिशिष्ट” “ब” मध्ये दर्शविलेल्या स्वयंसेवी संस्थावर राहिल.

५) या बाबींच्या अंमलबजावणी विषयी संपुर्ण अभिलेख जतन करण्याची व शासनामार्फत वेळोवेळी मागणी केल्यानुसार माहिती सादर करण्यांची तसेच राज्यस्तरीय सुकाणू समितीस सदर योजनेचा त्रैमासिक प्रगती अहवाल सादर करण्यांची जबाबदारी संबंधीत “परिशिष्ट” “अ” मध्ये दर्शविलेल्या ग्रामसभा व “परिशिष्ट” “ब” मध्ये दर्शविलेल्या स्वयंसेवी संस्थावर राहिल.

**उक्त वाचा क्र. २ येथील परिच्छेद क्र.५, ६ व ७ पुढीलप्रमाणे आहेत.**

५. सदर योजनेच्या अंमलबजावणीवर आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक यांचे नियंत्रण राहील. आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक यांनी स्वयंसेवी संस्थामार्फत राबविण्यात येणाऱ्या योजनांचा दर तीन महिन्यांनी आढावा घेऊन प्रगतीबाबत राज्य शासनास अवगत करावे.

६. प्रस्तुत योजनेचा कालावधी अठरा महिन्यांचा असेल. या योजनेंतर्गत निधीचे वितरण सांमजस्य करारानुसार कामाच्या प्रगतीनुसार टप्प्याटप्प्याने संबंधित स्वयंसेवी संस्थेस करण्यात येईल.

७. आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक यांनी प्रस्तुत शासन निर्णयासोबतच्या परिशिष्ट- अ मध्ये दर्शविलेल्या अ.क्र. १ व ४, ३४ व ३९ तसेच ७४ व ७५ येथील एकूण ६ गावांच्या **ग्रामसभांना** तसेच परिशिष्ट-ब मध्ये दर्शविलेल्या अ.क्र. १ ते १८ व २२ ते ३१, अ.क्र.३३ व ३४, अ.क्र. ४५ व ४६, अ.क्र. ५० व ५१, अ.क्र.५५ ते ५९, अ.क्र. ६३ व ६४ तसेच अ.क्र. ७० ते ७३ व अ.क्र. ७७ येथील एकूण ४६ गावांचे संवर्धन व व्यवस्थापन आराखडे तयार करण्यासाठी **संबंधित स्वयंसेवी संस्थांना** निधी वितरीत करावा. उर्वरीत गावांच्या बाबतीत उक्त स्वयंसेवी संस्थांनी त्यांच्याशी संबंधित असलेल्या गावांच्या ग्रामसभांचे ठराव आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक यांना सादर करावेत. प्रस्तुत ग्रामसभांचे ठराव प्राप्त झाल्यानंतरच आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक यांनी संबंधित ग्रामसभा / स्वयंसेवी संस्था यांना निधी वितरीत करावा.

**उपरोक्त परिच्छेद क्र. ५,६ व ७ ऐवजी पुढील प्रमाणे वाचावे.**

५. सदर योजनेतील अंमलबजावणीवर आयुक्त, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था महाराष्ट्र राज्य पुणे यांचे नियंत्रण राहील. आयुक्त आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था महाराष्ट्र राज्य पुणे व “परिशिष्ट” “अ” मध्ये दर्शविलेल्या ग्रामसभा व “परिशिष्ट” “ब” मध्ये दर्शविलेल्या स्वयंसेवी संस्थामार्फत राबविण्यात येणाऱ्या योजनांचा दर तीन महिन्यांनी आढावा घेऊन प्रगतीबाबत राज्य शासनास अवगत करावे.

६. प्रस्तुत योजनेचा कालावधी अठरा महिन्याचा असेल या योजनेंतर्गत निधीचे वितरण सामंजस्य करारानुसार कामाच्या प्रगतीनुसार टप्याटप्याने “परिशिष्ट” “अ” मध्ये दर्शविलेल्या ग्रामसभा व “परिशिष्ट” “ब” मध्ये दर्शविलेल्या संबंधीत स्वयंसेवी संस्थेस करण्यांत येईल.

७. आयुक्त आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था महाराष्ट्र राज्य पुणे यांनी प्रस्तुत शासन निर्णया सोबतच्या “परिशिष्ट” “अ” मध्ये दर्शविलेल्या सर्व गावांच्या ग्रामसभा व “परिशिष्ट” “ब” मध्ये दर्शविलेल्या संबंधीत स्वयंसेवी संस्थाना निधी वितरीत करावा.

२. सदर शासन शुद्धीपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक क्रमांक २०१८१०२५१६३८०२३९२४ असा आहे. हा निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Pandurang Mahadu Raut

Digitally signed by Pandurang Mahadu Raut
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Tribal Development, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=136cc102e03660c61e3577e800c6edb8125d21d6c9d7742a980d024e919fa85c, cn=Pandurang Mahadu Raut
Date: 2018.10.25 16:41:10 +05'30'

**( पांडुरंग म. राऊत )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा.मंत्री, आदिवासी विकास यांचे खाजगी सचिव
२) मा. राज्यमंत्री, आदिवासी विकास यांचे खाजगी सचिव
३) मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
४) प्रधान सचिव (महसूल), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.
५) सचिव, ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई
६) प्रधान सचिव (कृषी व पदुम), मंत्रालय, मुंबई
७) सचिव (वने), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई
८) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) १/२, महाराष्ट्र मुंबई/नागपूर.
९) महालेखापाल (लेखा परिक्षा), १/२, महाराष्ट्र मुंबई/नागपूर
१०) आयुक्त, आदिवासी विकास आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य,नाशिक
११) अपर आयुक्त, आदिवासी विकास, ठाणे, नाशिक, नागपूर,अमरावती
१२) जिल्हाधिकारी, पालघर, ठाणे, नंदुरबार, जळगांव, गोंदीया, यवतमाळ, चंद्रपूर, गडचिरोली
१३) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हापरिषद, पालघर, ठाणे, नंदुरबार, जळगांव, गोंदीया, यवतमाळ, चंद्रपूर, गडचिरोली
१४) सर्व प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प.
१५) डॉ. माधव गाडगीळ, वन व जैव विविधता व्यवस्थापन अभ्यास केंद्र, ए-१८, स्प्रिंगफ्लॉवर्स, पंचवटी, पाषाण, पुणे
१६) श्री. ब्रायन लोबो, सृजन संस्था, एम.व्ही. सुपरमार्केट, कचेरी रोड, पालघर
१७) श्री. मोहन हिराबाई हिरालाल, वृक्षमित्र गडचिरोली-चंद्रपूर, शेंडे प्लॉट, रामनगर, चंद्रपूर, जि. चंद्रपूर
१८) डॉ. सतीश गोगुलवार, आम्ही आमच्या आरोग्यासाठी, मु.पो.ता.कुरखेडा, गडचिरोली
१९) श्री. दिलीप गोडे, विदर्भ निसर्ग संरक्षण संस्था, बी-४०१, गौंडवाना ध्रुव अपार्टमेंन्ट, के. टी. नगर, नागपूर
२०) श्रीम. इंदवी तुळपुळे, वन निकेतन, मु. पो. ताल, ता. मुरबाड, जि. ठाणे.
२१) श्री.केशव गुरनुले ,सृष्टी संस्था, येरंडी, पो.गोठणगाव, ता. कुरखेडा गडचिरोली
२२) श्री. विजय देढे , पर्यावरण मित्र विरुर स्टेशन, ता. राजूरा, जि.चंद्रपूर

२३) श्रीम. प्रतिभा शिंदे, लोकसमन्वय प्रतिष्ठान,"बिरसा भवन" प्लॉट नं. ४४, विक्रम नगर, तळोदा, जि. नंदुरबार
२४) श्रीमती पूर्णिमा उपाध्याय, खोज, यशवंत भवन, मु.पो.गौरखेडा (कुंभी), ता. अचलपूर, जि. अमरावती.
२५) श्री. अरुण शिवकर, साकव पेण प्रकल्प, मु. देवळी, पो. खारपाले, ता.पेण, जि. रायगड
२६) श्री. दत्ता पाटील, युवा ग्रामीण, गोंदीया
२७) श्री. किशोर मोघे, ग्रामीण समस्या मुक्ती ट्रस्ट, यवतमाळ
२८) श्री. रुपचंद दखने, ग्रामीण आरोग्य, कुरखेडा,गडचिरोली
२९) संबंधित ग्रामसभा/ ग्रामपंचायती
३०) कक्ष अधिकारी ( का.१९ ) आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.३२
३१ ) सर्व उप सचिव/अवर सचिव/कार्या.अधिकारी, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई- ३२.
३२) निवडनस्ती(का.१४) आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.